**मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा ही केंद्र शासन पुरस्कृत जिल्हा योजना राबविण्याबाबत कार्यपध्दती--**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.मत्स्यवि-२४१०/५६४/प्र.क्र.११३/१०/पदुम-१३,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.**
**दिाांकः- ३ सप्टेंबर,२०१०.**

**वाचा :-** १) शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग मत्स्यवि-१९०९/प्र.क्र.१९०/०९, दिनांकः-१२.११.२००९.
२) शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग मत्स्यवि-२४०९/प्र.क्र.११/०९, दिनांकः-२०.२.२०१०.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.३१०१३/१/०७-Fy (३), दिनांकः- १९.१.२००९.
४) केंद्र शासनाचे पत्र क्र.३१०१३/१/०७-Fy(३), दिनांक १.४.२०१०.

**प्रस्तावना :-**

मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा या केंद्र शासन पुरस्कृत योजनेअंतर्गत मत्स्यकास्तकारांना मत्स्यतळी बांधण्यास प्रोत्साहन देणे, निवडक तलावात मत्स्यसंवर्धन करणे, मच्छिमारांना तांत्रिक सल्ला/मार्गदर्शन करणे, मत्स्योत्पादन ते विक्रीपर्यंत सर्व कामात एकसूत्रता आणणे, मत्स्योत्पादनाची अपेक्षित पातळी गाठणे आदी कार्यक्रम राबविण्यात येतात. सदर योजना सन २००९-१० मध्ये पुढे चालू ठेवण्यास उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १२.११.२००९ अन्वये मान्यता देण्यात आली होती. सदर योजना सन २०१०-११ मध्ये खालील मार्गदर्शक सूचना, निकष, अटी / शर्तीसह पुढे चालू ठेवण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक ३१०१३/१/०७-Fy(३), दि. १ एप्रिल २०१० अन्वये ही योजना सन २०१०-११ मध्ये पुढे चालू ठेवण्यास प्रशासकीय मान्यता दिली आहे. त्यामुळे आता सदर योजना सन २०१०-११ मध्ये पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात येत आहे.
२) केंद्र शासनाने उपरोक्त शासन निर्णयान्वये सन २००९-१० मधील योजना सन २०१०-११ मध्ये राबविण्यास मान्यता देताना योजनांच्या अर्थसहाय्य पध्दतीमध्ये कोणताही बदल केलेला नाही त्यामुळे शासन निर्णय, दि. २० फेब्रुवारी, २०१० अन्वये लागू करण्यात आलेला सुधारित अर्थ सहाय्याचा आकृतीबंध सन २०१०-११ मध्येही या शासन निणयान्वये लागू करण्यात येत आहे. तसेच सदर शासन निर्णयान्वये निर्धारित करण्यात आलेली यंत्रणा कार्यान्वयन कार्यपध्दती या शासननिर्णयाव्दारे पुढे चालू ठेवण्यात येत आहे.
३) सदर योजना राबविण्यासाठी नियोजन विभागाच्या सुचनेनुसार अंशतः बदल करून ***विवरण पत्र अ*** प्रमाणे मार्गदर्शक सूचना,निकष,अटी/शर्ती लागू करण्यात येत आहेत.

४) योजना अंमलबजावणीबाबतचा विभागाचा एकत्रित अहवाल आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांना वेळोवेळी सादर करावा.

५) सदर योजनेचा खर्च केंद्र शासनाच्या सुधारीत आकृतीबंधानुसार केंद्र हिस्सा ७५% व राज्य हिस्सा २५% याप्रमाणात खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१०-११ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

i) केंद्र हिस्सा लेखाशिर्ष

२४०५ - मत्स्यव्यवसाय

१०१ - भूजल मत्स्यव्यवसाय

(०२) (०४) - मत्स्यसंवर्धन विकास अभिकरण यंत्रणा केंद्र पुरस्कृत योजाना (२४०५०८२५).

ii) राज्य हिस्सा हा मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा या जिल्हास्तरीय योजनेतून उपलब्ध होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

६) हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१९८/१४३१ दिनांक २४.८.१० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सही/-

**(प. श. अहमद)**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवधन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.**

प्रति,

प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग

सर्व प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय,

सर्व सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय,

महालेखापाल (लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,/निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

सर्व कोषागार अधिकारी.

निवड नस्ती.

**विवरणपत्र अ.**

**केंद्र पूरस्कृत मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा या योजनेच्या सुधारित अर्थसहाय्याचा आकृतीबंधास मंजूरी देणारे विवरणपत्र.**

| अ.क्र. | बाब /घटक. | अनुज्ञेय अनुदान |
|---|---|---|
| १. | 2. | 3. |
| १. | मत्स्यसंवर्धन तळी बांधकाम, पाणी पुरवठा व्यवस्थेसह. | **१)सपाट भागात प्रति हेक्टरी खर्च रू. ३.०० लाख.**<br>**अनुदान** - एकुण खर्चाच्या २०% जास्तीत जास्त, रू. ०.६० लाख प्रति हेक्टर सर्वसाधारण शेतकऱ्यांसाठी व एकूण खर्चाच्या २५% जास्तीत जास्त रू. ०.७५ लाख प्रति हेक्टर अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांसाठी.<br>**१)डोंगराळ भागात प्रति हेक्टरी खर्च रू. ४.०० लाख.**<br>**अनुदान** - एकुण खर्चाच्या २०% जास्तीत जास्त रू. ०.८० लाख प्रति हेक्टर सर्वसाधारण शेतकऱ्यांसाठी व एकूण खर्चाच्या २५% जास्तीत जास्त रू. १.०० लाख प्रति हेक्टर अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांसाठी. |

**अ) मार्गदर्शक सूचना.**

१) प्रेस नोट, सभा / मेळावे इत्यादी माध्यमाव्दारे योजनेची व्यापक प्रसिध्दी करून अर्ज मागविण्यात यावे.
२) प्राप्त अर्जाची छानननी करून परिपूर्ण प्रस्तावानूसार स्थळ सर्वेक्षण करावे.
३) संवर्धनक्षम प्रकल्पाचे जमीनीचे महसूली दस्तावेज, अंदाज पत्रक आराखडा, प्रकल्प अहवाल इत्यादीसह परिपूर्ण प्रस्तावास प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय यांचेकडून तांत्रिक मान्यता घ्यावी.
४) प्रस्तावीत प्रकल्पास वेळोवेळी भेटी देऊन अंदाज पत्रक आराखडा व प्रकल्प अहवालाप्रमाणे सर्वेक्षण करावे.
५) प्रकल्पाचे काम पुर्ण झाल्यानंतर तांत्रिक अधिकारी यांनी अंतिम सर्वेक्षण व पंचनामा करावा व बांधकामाचे शासकीय अभियंत्याकडून मुल्यांकन करून घ्यावे.
६) प्रकल्पाचे काम पुर्ण झाल्यानंतर आवश्यक नोंदीचे महसुली दस्तावेज, मुल्यांकन प्रमाणपत्र, इत्यादी दस्तावेज प्राप्त करुन घ्यावे.
७) अनुदान अदा करण्यासाठी वित्तीय शक्तीच्या अधिन योग्य ती मान्यता द्यावी.

**ब) लाभार्थी निवडीचे निकष.**

१) तळी बांधकाम अर्जदाराकडे स्वतःच्या मालकीची अथवा ५ वर्षे कालावधीच्या करारावर भाडेपट्टयाने घेतलेली , पाणी टिकवून ठेवणारी मत्स्यसंवर्धनक्षम शेत जमीन असावी.
२) स्वतःच्या मालकीची अथवा ५ वर्षे कालावधीच्या भाडेपट्टयाच्या कराराची बारमाही पाणी पुरवठयाची व्यवस्था असावी.

**क)अटी व शर्ती :-**

१) लाभार्थीस लाभ मिळालेल्या आर्थिक वर्षापासून ५ वर्षे मत्स्यव्यवसाय करणे बंधनकारक राहील.
२) एका लाभार्थीस जास्तीत जास्त ५ हेक्टर पर्यंतच्या क्षेत्रासाठी अनुदान अनुज्ञेय राहील.
३) एका लाभार्थीसाठी व क्षेत्रासाठी केवळ एकदाच अनुदान अनुज्ञेय राहिल.

४) लाभार्थींनी रु.१००/- किंमतीच्या स्टॅम्प पेपरवर कमीत कमी पाच वर्षे मत्स्यसंवर्धन करण्याचा तसेच बारमाही पाणीपुरवठयाचा करारनामा करुन देणे बंधनकारक राहिल.

लाभार्थीने दरमहा आर्थिक भौतिक अहवाल सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालयात सादरकरावा.

| | | |
|---|---|---|
| २) | **तळयाचे / तलावाचे पु-न:प्रापन (Reclamation) / नूतनीकरण** | **आवश्यक खर्च रू. ०.७५ लाख प्रति हेक्टर.**<br>**अनुदान -** एकूण खर्चाच्या २०% जास्तीत जास्त रू. १५,०००/- प्रति हेक्टर सर्वसाधारण शेतकऱ्यांसाठी व एकूण खर्चाच्या २५% जास्तीत जास्त रू. १८,०००/- प्रति हेक्टर अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांसाठी. |

**अ) मार्गदर्शक सुचना.**

घटक अ.क्र.१ प्रमाणे.

**ब) लाभार्थी निवडीचे निकष.**

लाभार्थीकडे मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणेअंतर्गत ५ वर्षापूर्वी बांधकाम केलेला तळे / तलाव असावा.

**क)अटी व शर्ती :-**

१) लाभार्थीस लाभ मिळालेल्या आर्थिक वर्षापासून ५ वर्षे मत्स्यव्यवसाय करणे बंधनकारक राहील.
२) एका लाभार्थीस जास्तीत जास्त ५ हेक्टर पर्यंतच्या क्षेत्रासाठी अनुदान अनुज्ञेय राहील.
३) लाभार्थींनी रु.१००/- किंमतीच्या स्टॅम्प पेपरवर कमीत कमी ५ वर्ष मत्स्यसंवर्धन करण्याचा तसेच बारमाही पाणीपुरवठयाचा करारनामा करुन देणे बंधनकारक राहिल.

| | | |
|---|---|---|
| ३) | **मत्स्यशेती करिता प्रथम वर्षासाठी निविष्ठा ( Input) (मत्स्यबिज, मत्स्य खादय, रासायनिक खते आणि मत्स्य रोग टाळण्यासाठी प्रतिबंधात्मक उपाय (ई.यु.एस.)** | **अ) फिनफिश संवर्धनासाठी आवश्यक खर्च रू. ०.५० लाख प्रति हेक्टर.**<br>**अनुदान -** एकूण खर्चाच्या २०% जास्तीत जास्त रू. ०.१० लाख प्रति हेक्टर सर्वसाधारण शेतकऱ्यांसाठी व एकूण खर्चाच्या २५% जास्तीत जास्त रू. ०.१२५ लाख प्रति हेक्टर अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांसाठी.<br>**ब) गोडया पाण्यातील कोळंबी शेती.**<br>**अपेक्षित खर्च रू. १.८० लाख प्रति हेक्टर.**<br>**अनुदान -** एकूण खर्चाच्या २०% जास्तीत जास्त रू. ०.३६ लाख प्रति हेक्टर सर्वसाधारण शेतकऱ्यांसाठी व एकूण खर्चाच्या २५% जास्तीत जास्त रू. ०.४५ लाख प्रति हेक्टर अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांसाठी. |

**अ) मार्गदर्शक सुचना.**

१) घटक अ.क्र.१ प्रमाणे.
२) तांत्रिक अधिकारी यांचे समक्ष इष्टतम प्रमाणात मत्स्य बोटुकली / झिंगा बीज संचयन करावे तसेच निविष्ठा वापरा बाबत मत्स्यव्यवसाय अधिकाऱ्यांनी देखरेख करून नियंत्रण करावे.

**ब) लाभार्थी निवडीचे निकष.**

प्रथम वर्षासाठी निविष्ठा अर्जदाराकडे १ हेक्टर पेक्षा कमी पासून ५ हेक्टर पर्यतचे स्वत:च्या मालकीचा अथवा ५ वर्षे कालावधीच्या करारावर भाडेपट्टयाने घेतलेला बारमाही/ दिर्घहंगामी तलाव असावा.

**क)अटी व शर्ती :-**

१) लाभार्थीस लाभ मिळालेल्या आर्थिक वर्षापासुन ५ वर्षे मत्स्यव्यवसाय करणे बंधनकारक राहील.
२) एका लाभार्थीस जास्तीत जास्त ५ हेक्टर पर्यंतच्या क्षेत्रासाठी अनुदान अनुज्ञेय राहील.
३) एका लाभार्थीसाठी व क्षेत्रासाठी केवळ एकदाच अनुदानअनुज्ञेय राहिल.
४) लाभार्थीने रु.१००/- किंमतीच्या स्टॅम्प पेपरवर कमीत कमी पाच वर्ष मत्स्यसंवर्धन करण्याचा तसेच बारमाही पाणीपुरवठयाचा करारनामा करुन देणे बंधनकारक राहिल.
५) लाभार्थीने दरमहा आर्थिक भौतिक अहवाल सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालयात सादर करावा.

| | | |
|---|---|---|
| ४) | **गोडया पाण्यातील मत्स्यबिज उत्पादन केंद्र (हॅचरी).** | **१)सपाट भागात रू. १२ लाख खर्च प्रती १० मिलीयन फ्राय क्षमतेच्या मत्स्यबिज उत्पादन केंद्रासाठी (हॅचरी) आणि डोंगराळ भागात रू. १६ लाख खर्च प्रती १० मिलीयन फ्राय क्षमतेच्या मत्स्यबिज उत्पादन केंद्रासाठी.** <br> **अनुदान -** एकूण खर्चाच्या २०% जास्तीत जास्त रू. ०.६० लाख प्रति हेक्टर सर्वसाधारणसाठी व एकूण खर्चाच्या २५% जास्तीत जास्त रू. ०.७५ लाख प्रति हेक्टर अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांसाठी. |

**अ) मार्गदर्शक सुचना.**
घटक अ.क्र.१ प्रमाणे.
**ब) लाभार्थी निवडीचे निकष.**
१) केंद्र बांधकाम अर्जदाराकडे स्वतःच्या मालकीची अथवा १५ वर्षे कालावधीच्या करारावर भाडेपट्ट्याने घेतलेली , पाणी टिकवून ठेवणारी मत्स्यसंवर्धनक्षम शेत जमीन असावी.
२) स्वतःच्या मालकीची अथवा १५ वर्षे कालावधीच्या भाडेपट्टयाच्या कराराची बारमाही पाणी पुरवठयाची व्यवस्था असावी.
३) लाभार्थी कडे मत्स्यबिज उत्पादन केंद्र बांधकाम करून चालविण्याची आर्थिक तसेच तांत्रिक क्षमता असावी.

**अटी व शर्ती :-**
१) लाभार्थीस लाभ मिळालेल्या आर्थिक वर्षापासून १५ वर्षे मत्स्यबिज उत्पादन करणे बंधनकारक राहील.
२) दर वर्षी कमीत कमी १० मिलीयन फ्राय उत्पादन करणे बंधनकारक राहील.
३) जिल्हयातील स्थानिक तलाव ठेका धारकास मत्स्यबिज प्राधान्याने देणे बंधनकारक राहील.
४) लाभार्थीने १५ वर्ष मत्स्यबिज निर्मिती करण्याचा करारनामा करणे बंधनकारक आहे.
५) लाभार्थीने दरमहा आर्थीक भौतिक अहवाल सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालयात सादर करावा.

| | | |
|---|---|---|
| ५) | **मत्स्य खादय विभाग (Unit)** | लहान युनिट - युनिट खर्च रू. ७.५० लाख ( क्षमता १.२ क्विंटल / दिवस) <br> **अनुदान -** एकूण खर्चाच्या २०% जास्तीत जास्त रू. १.५० लाख प्रति युनिट सर्व लाभार्थीसाठी. |

**अ) मार्गदर्शक सुचना.**
घटक अ.क्र.१ प्रमाणे.
**लाभार्थी निवडीचे निकष :-**

१) लार्भार्थीकडे कमीत कमी १.२ क्विंटल /दिवस मत्स्य खादय उत्पादन घेण्यासाठी आवश्यक साधन सामुग्री उपलब्ध असावी, तसेच प्रकल्प उभारणीची तांत्रिक व आर्थिक क्षमता असावी.
२) लार्भार्थी कडे उत्पादीत मत्स्य खादय साठवण्याची क्षमता असलेले गोडावून असावे.

**अटी व शर्ती :-**

१) लाभार्थीस लाभ मिळालेल्या आर्थिक वर्षापासून १५ वर्षे मत्स्यखाद्य उत्पादन करणे बंधनकारक राहील.
२) कमीत कमी १.२ क्विंटल / दिवस मत्स्य खादय उत्पादन करण्याचा करारनामा करून देणे बंधनकारक राहील.
३) लाभार्थीने दरमहा आर्थिक, भौतिक अहवाल सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालयात सादर करावा.

| | | |
|---|---|---|
| ६) | **मोठे , गोडया पाण्यातील कोळंबी बीज उबवणी केंद्र स्थापन करण्यासाठी ( प्रत्येक राज्यासाठी एक ) आणि लहान उबवणी केंद्र (लाभार्थी साठी ).** | १) २५ मिलियन पिएल प्रतिवर्षी क्षमतेच्या प्रत्येक मोठया उबवणी केंद्रासाठी एकूण खर्च रू. १२ लाख. |
| | **मार्गदर्शक सुचना.** प्रत्येक राज्यास राज्यस्तरीय उबवणी केंद्र स्थापन करण्यासाठी हे अनुदान केवळ एकदाच अनुज्ञेय राहील. | |
| | | २) ५-१० मिलियन पिएल प्रतिवर्षी क्षमतेच्या प्रत्येक लहान उबवणी केंद्रासाठी (गोडयापाण्यातील कोळबी बीज उबवणी केंद्र) खर्च रू. ३० लाख.<br>**अनुदान** - एकूण खर्चाच्या २०% परंतू जास्तीत जास्त रू. २.४० लाख प्रति उद्योजकास (Entrepreneurs). |

**अ) मार्गदर्शक सुचना.**
घटक अ.क्र.१ प्रमाणे.
**ब) लाभार्थी निवडीचे निकष.**

१) तळी बांधकाम अर्जदाराकडे स्वतःच्या मालकीची अथवा १५ वर्षे कालावधीच्या करारावर भाडेपट्ट्याने घेतलेली , पाणी टिकवनू ठेवणारी मत्स्यसंवर्धनक्षम शेत जमीन असावी.
२) स्वतःच्या मालकीची अथवा १५ वर्षे कालावधीच्या भाडेपट्टयाच्या कराराची बारमाही पाणी पुरवठयाची व्यवस्था असावी.

**अटी व शर्ती :-**

१) लाभार्थीस लाभ मिळालेल्या आर्थिक वर्षापासून १५ वर्षे ५-१० मिलीयन पिएल उत्पादन करणे बंधनकारक राहील.
२) कमीत कमी ५-१० मिलीयन पिएल उत्पादन करण्याचा करारनामा करून देणे बंधनकारक राहील.

३) लाभार्थीने दरमहा आर्थिक व भौतिक अहवाल सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालयात सादर करावा.

| | | |
|---|---|---|
| ७) | **प्रत्येक मत्स्य संर्वधन विकास यंत्रणेला माती आणि पाणी परीक्षणासाठी संच उपलब्ध करणे.** | माती आणि पाणी परीक्षणासाठीच्या प्रतिसंचाची किंमत रू. ०.४० लाख. |

**मार्गदर्शक सूचना.**
प्रत्येक मत्स्य संर्वधन विकास यंत्रणेला असा संच केवळ एकदाच मजूर करण्यात येईल व एकदाच अनुदान अनुज्ञेय राहील.

| | | |
|---|---|---|
| ८) | **शोभिवंत माश्यांसाठी उबवणी केंद्रासह एकात्मीक विभागाची (Unit) उभारणी.** | **५ ते १० मिलियन फ्राय क्षमता असलेल्या प्रति उबवणी केंद्राचा एकूण खर्च रू. १५ लाख.**<br>**अनुदान -** एकूण खर्चाच्या २०% जास्तीत जास्त रू. १.५० लाख प्रति युनिट सर्व मत्स्यसंर्वधकासाठी अनुज्ञेय राहील. |

**अ) मार्गदर्शक सूचना.**
घटक अ.क्र.१ प्रमाणे.
**ब) लाभार्थी निवडीचे निकष.**

१) अर्जदाराकडे स्वतःच्या मालकीची अथवा १५ वर्षे कालावधीच्या करारावर भाडेपट्टयाने घेतलेली ५ ते १० मिलियन फ्राय उत्पादन क्षमता असलेली साधन सामूग्री असावी.
२) स्वतःच्या मालकीची अथवा १५ वर्षे कालावधीच्या भाडेपट्टयाच्या कराराची बारमाही पाणी पुरवठयाची व्यवस्था असावी.

**अटी व शर्ती :-**

१) लाभार्थीस लाभ मिळालेल्या आर्थिक वर्षापासून १५ वर्षे ५ ते १० मिलियन फ्राय उत्पादन करणे बंधनकारक राहील.
२) दर वर्षी कमीत कमी १० मिलीयन फ्राय उत्पादन करणे बंधनकारक राहील.
३) लाभार्थीने १५ वर्ष ५ ते १० मिलियन फ्राय निर्मिती करण्याचा करारनामा करणे बंधनकारक आहे.
४) लाभार्थीने दरमहा आर्थिक, भौतिक अहवाल सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालयात सादर करावा.

| | | |
|---|---|---|
| ९) | **शोभिवंत माशांसाठी प्रजनक साठा.** | रू. २५ लाख प्रति युनिट यामध्ये केंद्रा पासुन वाहतुक व वितरण व्यवस्था याचा समावेश आहे. |

**मार्गदर्शक सूचना.**
सदर योजना राज्य शासनासाठी उपलब्ध आहे.

| | | |
|---|---|---|
| १०) | **शोभिवंत माशांच्या बिजाचे प्रमाणीकरण.** | रू. २५लाख प्रति युनिट यामध्ये मासळी साठविण्याची सुविधा आणि रोगनिदान प्रयोग शाळेचा समावेश आहे. सदर योजना राज्य शासनासाठी उपलब्ध आहे. |

**मार्गदर्शक सूचना.**
सदर योजना राज्य शासनासाठी उपलब्ध आहे.

| | | |
|---|---|---|
| | | |
| ११) | **मत्स्य / कोळबी बिजाची वाहतुक.** | अनुदान - १००० फ्रायच्या वाहतुकी साठी रू. ३०/-. सर्व मत्स्य संर्वधन विकास यंत्रणेसाठी अनुज्ञेय. |
| **मार्गदर्शक सूचना.**<br>१) फक्त डोगराळ भागाकरिता लागु राहील.<br>२) सर्व मत्स्यसंर्वधन विकास यंत्रणेसाठी अनुज्ञेय.<br>३) वैयक्तीक मत्स्यशेतकऱ्यांसाठी लागू नाही. | | |
| १२) | **वाहन खरेदी** | प्रत्येक नवीन मत्स्यसंर्वधन विकास यंत्रणेसाठी वाहन खरेदीसाठी वाहनाच्या किमतीच्या ५० टक्के खर्च किवा वाहन पुर्नस्थापना<br>(Replace ) ( दुसरे वाहन) करण्यासाठी वाहनाच्या किंमतीच्या ५० टक्के खर्च अनुज्ञेय राहील. |
| **मार्गदर्शक सुचना.**<br>सदर योजना राज्य शासनासाठी उपलब्ध आहे. | | |

**टिपः-** उपरोक्त सर्व बाबीवरील खर्च, बाब क्रमांक १२ वाहन खरेदी वगळून केंद्र : राज्य शासनाकडून ७५:२५ या प्रमाणात करण्यात येईल.

--------------------